**पुणे एमआरटीएस-२: पुणे महानगर मेट्रो रेल टप्पा-१ मधील वनाज ते रामवाडी (मार्गिका क्र. २) च्या विस्तारित मार्गिका वनाज ते चांदणी चौक (मार्गिका क्र. २ए) आणि रामवाडी ते वाघोली(विठ्ठलवाडी) (मार्गिका क्र. २बी) या विस्तारीत मेट्रो रेल प्रकल्पाच्या अंमलबजावणीस मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पीआरडी-३३२३/प्र.क्र.१२४/नवि-७,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १५ मार्च, २०२४.**

**प्रस्तावना :-**

पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्प टप्पा-१ मधील मार्गिका क्र. २ (वनाज ते रामवाडी) च्या विस्तारीत मार्गिका क्र. २ए (वनाज ते चांदणी चौक) (पश्चिम विस्तार) व मार्गिका क्र. २बी (रामवाडी ते वाघोली/विठ्ठलवाडी) (पूर्व विस्तार) या एकूण रू. ३६०९.२७ कोटी प्रकल्प पूर्णत्व किंमतीच्या सविस्तर प्रकल्प अहवालास दि. १४.०८.२०२३ रोजीच्या पुणे महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेच्या बैठकीमध्ये ठराव क्र. १२६ अन्वये मंजुरी दिली आहे.

त्यानुसार महामेट्रोने दि. २५.०८.२०२३ रोजीच्या पत्रान्वये पुणे मेट्रो रेल्वे टप्पा-२ अंतर्गत वनाज ते चांदणी चौक (मार्गिका क्र. २ए) (लांबी १.१२ कि.मी., २ स्थानके) व रामवाडी ते वाघोली (विठ्ठलवाडी) (मार्गिका क्र. २बी) (लांबी ११.६३ कि.मी, ११ स्थानके) या एकूण १२.७५ कि.मी. लांबी असलेल्या उन्नत मार्गिकांच्या मेट्रो रेल्वे प्रकल्पाचा एकूण रू. ३७५६.५८ कोटी प्रकल्प किंमतीचा सविस्तर प्रकल्प अहवाल शासन मान्यतेस्तव सादर केला असून प्रकल्प प्रस्तावास मान्यता देणेबाबत शासनास विनंती केली आहे. त्यानुषंगाने सदर प्रकल्पाच्या प्रस्तावास राज्य शासनाकडून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहेः-

**०२. शासन निर्णय :-**

पुणे महानगर मेट्रो रेल प्रकल्प टप्पा-१ मधील वनाज ते रामवाडी (मार्गिका क्र. २) च्या विस्तारीत मार्गिका वनाज ते चांदणी चौक (मार्गिका क्र. २ए) व रामवाडी ते वाघोली(विठ्ठलवाडी) (मार्गिका क्र. २बी) या प्रकल्पांचे महत्व लक्षात घेता पुणे महानगरपालिकेने महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. मार्फत सादर केलेल्या सदर मेट्रो रेल प्रकल्पाच्या प्रस्तावास या शासन निर्णयाद्वारे खालीलप्रमाणे मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

१) पुणे महानगर मेट्रो रेल प्रकल्प टप्पा-१ मधील वनाज ते रामवाडी (मार्गिका क्र. २) च्या विस्तारीत मार्गिका वनाज ते चांदणी चौक (मार्गिका क्र. २ए) (लांबी १.१२ कि.मी. व २ स्थानके) व रामवाडी ते वाघोली (विठ्ठलवाडी) (मार्गिका क्र. २बी) (लांबी ११.६३ आणि ११ स्थानके) या एकूण १२.७५ कि.मी. लांबी, १३ उन्नत स्थानके असलेल्या रु. ३७५६.५८ कोटी प्रकल्प पूर्णत्व किंमतीच्या पूर्णत: उन्नत मेट्रो रेल्वे प्रकल्पांची महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (महामेट्रो) मार्फत अंमलबजावणी करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२) वनाज ते चांदणी चौक आणि रामवाडी ते वाघोली(विठ्ठलवाडी) या मेट्रो रेल प्रकल्पासाठी मेसर्स युएमटीसी यांनी अंदाजित केलेल्या सोबतच्या **परिशिष्ट क्र. १ व २** येथील तपशिलात नमूद रु.३७५६.५८ कोटी इतक्या प्रकल्प पूर्णत्व किंमतीच्या प्रकल्पाची सोबतच्या **परिशिष्ट क्र. ३** मध्ये नमूद वित्तीय सहभागाद्वारे निधी उभारुन अंमलबजावणी करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३) सदर प्रकल्पासाठी पुणे महानगरपालिकेने जमिनीसाठी द्यावयाचे योगदानाकरिता रू. २४ लाख रकमेचे वित्तीय सहाय्य/जमीन महामेट्रोला उपलब्ध करून देण्याबाबत पुणे महानगरपालिकेला निदेश देण्यात येत आहेत.

४) सदर प्रकल्पातील राज्य शासनाची समभागाची रू. ४९६.७३ कोटी रक्कम महामेट्रोला उपलब्ध करून देण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५) सदर प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या कराच्या ५० टक्के रक्कम, राज्य शासनाचे कर व शुल्क, भूसंपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहत आणि बांधकाम कालावधीतील व्याज यांवरील खर्चासाठी एकूण रु.६७८.४२ कोटी इतकी रक्कम राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून उपलब्ध करून देण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर दुय्यम कर्जाची परतफेड ही प्रकल्पासाठी घेण्यात येणाऱ्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर महामेट्रोने करण्याबाबत महामेट्रोला निर्देश देण्यात येत आहे.

६) सदर प्रकल्पासाठी केंद्र शासनाकडून रु.४९६.७३ कोटीचे समभाग व रू. १४८.५७ कोटी चे बिनव्याजी दुय्यम कर्ज सहाय्य मिळविण्याकरिता केंद्र शासनाकडे विनंती करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

७) सदर प्रकल्पासाठी केंद्र शासनामार्फत निधी प्राप्त करुन घेण्यासाठी पत्रव्यवहार करण्यास व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशन लि. यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८) सदर प्रकल्पाकरिता रू. १९३५.८९ कोटी रकमेच्या मर्यादेत द्विपक्षीय/बहुपक्षीय वित्तीय संस्था/अन्य वित्तीय संस्थामार्फत अल्प व्याज दराचे कर्ज घेण्यास, सदर कर्जाची मुद्दल, व्याज व इतर शुल्क यांचा कोणताही भार राज्यशासनावर येणार नाही या अटीवर, व्यवस्थापकीय संचालक, महामेट्रो यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

९) सदर प्रकल्पाच्या सोबतच्या **परिशिष्ट-३** मध्ये नमूद वित्तीय आराखड्यानुसार राज्यशासनाने सोसावयाच्या निधीपेक्षा अधिकचा निधी सदर प्रकल्पास उपलब्ध करुन देण्यात येणार नाही, याची नोंद महामेट्रो व पुणे महानगरपालिका यांनी घ्यावी.

१०) सदर प्रकल्पाकरिता द्विपक्षीय/बहुपक्षीय वित्तीय संस्थेमार्फत घेतल्या जाणाऱ्या कर्जाच्या मुद्दलाची परतफेड तसेच व्याजाची परतफेड याची जबाबदारी महामेट्रोची राहील. त्यामुळे शासनावर कोणताही अतिरिक्त भार येणार नाही याची खबरदारी महामेट्रोने घ्यावी.

११) सदर प्रकल्पाचे भाडे टप्पे व दराप्रमाणे पुढीलप्रमाणे सुरुवातीचे भाडेदर ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अंतर (कि.मी.) | ०-२ | २-४ | ४-६ | ६-९ | ९-१२ | १२-१५ | १५-१८ | १८-२१ | २१-२४ | २४-२७ | २७-३० | ३० पेक्षा अधिक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| भाडे (रु.) | २० | २६ | ३० | ३८ | ४१ | ४६ | ४९ | ५३ | ५६ | ५८ | ६४ | ६८ |

उल्लेखीत भाडेदरांत मेट्रो रेल प्रकल्प सुरू करण्यापूर्वी प्रकल्पाची वित्तीय व्यवहार्यता तपासून गरज भासल्यास, शासनाच्या पूर्व मान्यतेने, आवश्यक ते बदल करण्यास महामेट्रोला निर्देश देण्यात येत आहेत. मेट्रो कायद्यानुसार भाडेदरात पुढील बदल करण्याचे अधिकार भाडे निर्धारण समितीला (Fare Fixation Committee) आहेत, याची नोंद घेण्याबाबत संबंधितांना सूचित करण्यात येत आहे.

१२) सदर मेट्रो प्रकल्पाची अंमलबजावणी “मेट्रो रेल्वे अधियम २००९ (सुधारित)” नुसार करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१३) सदर दोन्ही मेट्रो मार्गिका प्रकल्प विविध प्रयोजनार्थ "निकडीचा सार्वजनिक प्रकल्प" व "महत्वाकांक्षी नागरी वाहतूक प्रकल्प" म्हणून घोषित करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१४) सदर मेट्रो रेल्वे प्रकल्प वेळेवर पूर्ण करण्यासाठी मेट्रो रेल्वे स्थानक सुविधांकरीता व तसेच कारडेपोकरीता आवश्यक असलेल्या खाजगी जमिनी मेट्रो रेल्वे अधिनियम, २००९/ महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ /नविन केंद्रीय भूसंपादन व पूनर्वसन व पूनर्वसाहत अधिनियम, २०१३ अंतर्गत अथवा विकास हक्क/विकास हक्क हस्तांतरण यांचे माध्यमातून करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१५) सदर मेट्रो प्रकल्पाच्या मार्गिकेमध्ये तसेच मेट्रो स्थानकांमध्ये गरज वाटल्यास किरकोळ बदल करण्यास, प्रकल्पाच्या व्याप्तीमध्ये अथवा प्रकल्पाच्या खर्चात वाढ होत असल्यास त्यास शासनाची पूर्व मान्यता घेण्याच्या अटीवर, व्यवस्थापकीय संचालक ,महामेट्रो यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

१६) सदर प्रकल्पाची अंदाजित किंमत, प्रकल्पामधुन मिळणारा परतावा याकरिता प्रकल्प अहवालात घेण्यात आलेल्या गृहीतकांची कसोशीने तपासणी करणे व ह्या बाबींवर स्वतंत्र अभिप्राय (Second opinion) घेण्याची कार्यवाही करण्यास महामेट्रोस निर्देश देण्यात येत आहेत.

१७) सदर प्रकल्पाच्या मंजूर प्रकल्प पुर्णत्व खर्चामध्ये किंमतवाढ, चलन विनिमय दरांतील बदल, प्रकल्पाच्या व्याप्तीमध्ये बदल, डीपीआरमध्ये न दर्शविलेल्या आवश्यक बाबींचा समावेश, प्रकल्प उभारणीच्या विहीत मुदतीमध्ये वा त्यापुढे टाळता येणारा विलंब, अशा करणांमुळे वाढ झाल्यास असा वाढीव खर्च स्थानिक प्राधिकरण, शासकीय/निम शासकीय संस्था त्यांच्याकडील जमिनी (डीपीआरमध्ये दर्शविलेल्या जमिनीव्यतिरिक्त) उपलब्ध करून घेऊन अशा जमिनीचे विकसन करून टीओडी, एफएसआय व इतर अनुषंगिक माध्यमातून निर्माण होणा-या आर्थिक स्त्रोतामधून भागविण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१८) राज्यातील सर्व मेट्रो रेल्वे प्रकल्पातील प्रलंबित समस्यांचे निराकरण करण्यासाठी तसेच अंमलबजावणीच्या दृष्टीकोनातून धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी यापूर्वीच्या शासन निर्णयाद्वारे मेट्रो प्रकल्पांसाठी स्वतंत्रपणे गठीत करण्यात आलेल्या सर्व उच्चस्तरीय समित्या निरसित करून शासनातर्फे **परिशिष्ट-५** नमूद केल्याप्रमाणे राज्यातील सर्व मेट्रो प्रकल्पांसाठी एकच कायमस्वरूपी उच्चाधिकार समिती (High Power Committee) गठीत करण्यास तसेच सदर समितीच्या कार्यक्षेत्रास मान्यता देण्यात येत आहे.

१९) सदर प्रकल्पाच्या खर्चात कोणत्याही कारणाने वाढ झाल्यास, सदर वाढीचा संपूर्ण भार/दायित्व घेण्याबाबत महामेट्रो व पुणे महानगरपालिकेला निर्देश देण्यात येत आहेत.

२०) मेट्रो रेल्वे बांधकाम कालावधी दरम्यान सदर मेट्रो मार्गालगतच्या शासकीय व निमशासकीय संस्थांच्या मोकळया जागांचा तात्पुरता वापर करण्यासाठी तसेच संबंधित विभागांनी सदर मोकळया जागा महामेट्रोला नाममात्र दराने उपलब्ध करून देण्यास संबंधित विभागांना निर्देश देण्यात आहेत.

२१) सदर प्रकल्पाच्या बांधकामासाठी सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये दर्शविण्यात आलेल्या मेट्रो मार्गालगतच्या कायमस्वरुपी आवश्यक असलेल्या जमिनी पुणे महानगरपालिका व इतर संबंधित शासकीय/निमशासकीय संस्थानी प्रचलित शासन नियमानुसार महामेट्रोला हस्तांतरित करण्याकरीता संबंधितांना निर्देश देण्यात येत आहेत.

२२) सदर प्रकल्पाच्या खर्चात भूसंपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहतीकरण यामधील विलंबामुळे वाढ होणार नाही याची दक्षता घेण्यास पुणे महानगरपालिका व महामेट्रो यांना निर्देश देण्यात येत आहेत.

२३) सोबतच्या **परिशिष्ट-४** येथे नमूद केल्याप्रमाणे "समर्पित नागरी परिवहन निधी" च्या उभारणीस आणि इतर स्त्रोतामधून उपलब्ध झालेला निधी "समर्पित नागरी परिवहन निधी" मध्ये जमा करुन तो निधी सदर प्रकल्पासाठी घेतलेल्या कर्जाची परतफेड, कार्य व देखभाल (O&M), भविष्यात येणाऱ्या पायाभूत सुविधा प्रकल्पाच्या अंमलबजावणी करण्यासाठी इ. साठी महामेट्रोने वापरण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२४) या प्रकल्पांतर्गत प्रकल्पग्रस्तांचे पुर्नवसन करण्याकरीता एमयुटीपी प्रकल्पासाठी प्रकल्पग्रस्तांचे पुर्नवसनासाठी गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक प्रकल्प-१७००/सीआर-३१/स्लम-२, दिनांक १२.१२.२००० अन्वये लागू केलेले पुर्नवसन धोरण सदर प्रकल्पासही लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रकल्पग्रस्तांचे पुर्नवसन महामेट्रोमार्फत करण्यास व्यवस्थापकीय संचालक महामेट्रो यांना ,निदेश देण्यात येत आहेत. या प्रकल्पांमधील प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसनासाठी नागरी क्षेत्रात ज्या ठिकाणी महामेट्रोकडे सदनिका उपलब्ध होत नसतील त्या ठिकाणी नगर विकास विभाग शा.नि. क्र चंमपा-२०१७/प्र.क्र.२३/न.वि.-२६ दिनांक १३.०६.२०१८ मधील मार्गदर्शक सूचनाप्रमाणे अतिक्रमणधारकांना एकरकमी मोबदला देण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२५) सदर प्रकल्पाच्या मंजूर प्रकल्प पुर्णत्व किंमतीमध्ये किंमतवाढ, चलन विनिमय दरांतील बदल, प्रकल्पाच्या व्याप्तीमध्ये बदल, डीपीआरमध्ये न दर्शविलेल्या आवश्यक बाबींचा समावेश, प्रकल्प उभारणीच्या विहीत मुदतीमध्ये वा त्यापुढे टाळता येणारा विलंब, अशा कारणांमुळे वाढ झाल्यास असा वाढीव खर्च स्थानिक प्राधिकरण, शासकीय/निमशासकीय संस्था त्यांच्याकडील जमिनी (डीपीआरमध्ये दर्शविलेल्या जमिनीव्यतिरिक्त) उपलब्ध करून घेऊन अशा जमिनीचे विकसन करून टीओडी, एफएसआय वा इतर अनुषंगिक माध्यमातून निर्माण होणाऱ्या आर्थिक स्त्रोतामधून भागविण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२६) सदर मेट्रो रेल प्रकल्पाच्या बांधकाम खर्चात अवाजवी वाढ होणार नाही याची दक्षता घेऊन प्रकल्पाची उभारणी विहित मुदतीत करण्यात यावी, याबाबत महामेट्रो व पुणे महानगरपालिकेला निदेश देण्यात येत आहेत.

२७) रामवाडी ते वाघोली(विठ्ठलवाडी) या प्रस्तावित मेट्रो मार्गिकेच्या संरेखनातील एकूण ११.६३ किमीपैकी सुमारे १०.५ कि.मी. मार्गिका संरेखन हे भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणा (NHAI) द्वारे प्रस्तावित पुणे ते शिरूर या प्रस्तावित द्विस्तरीय उन्नत महामार्ग कॉरीडॉरला (Double Tier Elevated Highway Corridor) परस्परव्याप्त होणाऱ्या मेट्रो मार्गिका आणि NHAI च्या संरेखनाच्या एकत्रीकरण करण्याकरिता (Integration of alignments) सदर एकत्रिकरणासाठी येणाऱ्या खर्चाच्या भागिदारीबाबत महा-मेट्रो आणि यथास्थिती भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण किंवा सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्यात सामंजस्य करारनामा करण्याबाबत तसेच सदर एकत्रिकरणामुळे प्रकल्पावर अतिरीक्त आर्थिक भार येणार नाही याची खबरदारी महामेट्रोने घ्यावी.

**०३.** हा शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.२५२/१४४४, दिनांक २८/११/२०२४ व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.१६६/व्यय-३, दिनांक १२/०३/२०२४ अन्वये प्राप्त अभिप्राय तसेच दिनांक ११/०३/२०२४ रोजी पार पडलेल्या मा. मंत्रीमंडळ बैठकीतील निर्णयास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३१५२२१०१४९४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.03.15 22:19:37 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उपसचिव, महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. मा. उप मुख्यमंत्री(वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०.अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११.प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२.प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३.प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४.प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५.प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१६.प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१७.प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१८.सचिव (विशेष प्रकल्प), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१९.विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२०.अध्यक्ष, पुणे एकिकृत महानगर परिवहन प्राधिकरण, पुणे
२१.महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे.
२२.व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (महामेट्रो) नागपूर.
२३.आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे.
२४.पोलिस आयुक्त, पुणे.

२५. महाव्यवस्थापक, पुणे महानगर परिवहन महामंडळ मर्यादित, पुणे.
२६. सह सचिव, नगर रचना, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२७. संचालक, नगर रचना, मध्यवर्ती प्रशासकीय इमारत, पुणे.
२८. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२९. उप सचिव (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३०. निवड नस्ती (नवि-७).

**(नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांक : पीआरडी-३३२३/प्र.क्र.१२४/नवि-७, दिनांक १५ मार्च, २०२४ चे सहपत्र)**

**परिशिष्ट १**

**वनाज ते चांदणी चौक व रामवाडी ते वाघोली या उन्नत विस्तारीत मेट्रो रेल्वे प्रकल्पाची ठळक वैशिष्ट्ये**

| अ.क्र. | तपशील | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | घटक | | वनाज ते चांदणी चौक (मार्गिका २ए) | रामवाडी ते वाघोली (मार्गिका २बी) | एकूण |
| 1. | स्टॅन्डर्ड गेज | | १४३५ मि.मी. | | |
| 2. | मार्गाची एकूण लांबी (कि.मी) | | १.१२२ (उन्नत) | ११.६३३ (उन्नत) | १२.७५५ |
| 3. | एकूण स्थानके | | २ | ११ | १३ |
| 4. | प्रस्तावित कार डेपो | | पुणे मेट्रो रेल टप्पा-१ साठी बांधण्यात आलेल्या विद्यमान वनाज डेपोचे वर्धन(Augmentation) करून मार्गिका २ए व २बी साठी वनाज डेपो वापरण्यात येणार आहे. आवश्यकतेनुसार भविष्यात वाघोली कडील बाजूस सॅटेलाईट डेपो उभारण्यात येईल. | | |
| 5. | प्रकल्पासाठी आवश्यक जमीन | कायमस्वरूपी | ०.०१०६ हे | ०.५७११ हे. | ०.५८१७ हे. |
| | | तात्पुरती | २.५१२ हे. | २.६१ हे. | ५.१२२ हे. |
| 6. | प्रकल्प राबविण्याचा कालावधी | | जून, २०२३ ते जून, २०२७ ( टीप: प्रकल्पाचे बांधकाम चालू झाल्यापासून ४ वर्षे) | | |
| 7. | जमिनीची किंमत (मूळ)(रू. कोटी) | कायमस्वरूपी | २.१८ | १४.०२ | १६.०२ |
| | | तात्पुरती | २.७३५ | ३.२२६ | ०५.९६ |
| 8. | दरवाढ @५% प्रतिवर्ष (रू. कोटी) | | ५०.९३६ | ४५७.२८८ | ५०८.२२ |
| 9. | बांधकाम दरम्यानचे व्याज (IDC) (रू. कोटी) | | १९.४४ | १६०.५६ | १८०.०० |
| 10. | प्रकल्प पूर्णत्वाची किंमत (सुधारीत केलेली)<br>(जमिन व सर्वकरांसहीत) (रू. कोटी) | | ४०५.७४ | ३३५०.८४ | ३७५६.५८ |
| 11. | वित्तीय अंतर्गत परतावा दर मालमत्ता विकासासह (FIRR) | | ८.२२% | | |
| 12. | आर्थिक परतावा दर (EIRR) | | १७.६५% | | |
| 13. | प्रवासी क्षमता<br>(३ डब्यांची मेट्रो रेल गाडी) | | १. ६ प्रवासी प्रतिवर्ग मीटर प्रमाणे: ७६४ प्रवासी क्षमता.<br>२. ८ प्रवासी प्रतिवर्ग मीटर प्रमाणे: ९७५ प्रवासी क्षमता. | | |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.03.15 22:20:13 +05'30'

परिशिष्ट-२

सदर प्रकल्पाच्या अंदाजित भांडवली खर्चाचा तपशील

| Sr. No. | Components | Cost of Line 2A (Rs. Crore) | Cost of Line 2B (Rs. Crore) | Total |
|---|---|---|---|---|
| | | A | B | A+B |
| 1 | Land )Government and Private( | 4.92 | 17.23 | **22.15** |
| 2 | Rehabilitation and resettlement | 0.04 | 57.60 | **57.64** |
| 3 | Environmental Management Plan | 0.67 | 2.14 | **2.81** |
| 4 | Alignment and Formation | 49.44 | 535.70 | **585.14** |
| 5 | Station Buildings | 80.97 | 455.50 | **536.47** |
| 6 | Permanent Way | 8.82 | 95.21 | **104.03** |
| 7 | Traction and Power Supply | 10.02 | 161.13 | **171.15** |
| 8 | Signalling and Telecommunication | 18.62 | 155.09 | **173.71** |
| 9 | Automatic Fare Collection System | 8.34 | 47.93 | **56.27** |
| 10 | Platform Screen Doors | 5.36 | 30.82 | **36.18** |
| 11 | Shifting of Miscellaneous Utilities | 8.02 | 83.12 | **91.14** |
| 12 | Multi Modal Integration & Last Mile Connectivity | 32.60 | 46.94 | **79.54** |
| 13 | Depot, Admin Buildings and Operation and control centre | 0 | 25.05 | **25.05** |
| 14 | Staff Quarters | 3.43 | 35.54 | **38.97** |
| 15 | Security | 0.88 | 4.85 | **5.73** |
| 16 | Cyber Security | 0.5 | 4.50 | **5.00** |
| 17 | Rolling Stock | 28.58 | 400.13 | **428.71** |
| 18 | Total on all items except Land and R&R (except Item Sr. No 1 & 2) | 256.25 | 2083.65 | **2339.90** |
| 19 | General Charges incld. Design Charges @ 5% on all items except Land and R&R (i.e. on Item No 18) | 12.81 | 104.18 | **116.99** |
| 20 | Contingencies @3% on all items except Land and R & R (i.e. on Item. No. 18) | 7.69 | 62.51 | **70.20** |
| 21 | Total including Contingencies & excluding Land and R&R (Sr. No. 18+19+20) | 276.75 | 2250.34 | **2527.09** |
| 22 | Total including Contingencies & including Land and R&R (Sr. No. 1+2+21) | 281.71 | 2325.17 | **2606.88** |
| 23 | Central and State Taxes (at July 2022 Price Level) | 51.65 | 428.69 | **480.34** |
| 24 | Total Cost Including Taxes and Duties with Land and R&R (Sr. No. 22+23) | 333.36 | 2753.86 | **3087.22** |
| 25 | Escalation @5% per annum on the above (i.e. on Sr. No. 24) | 52.94 | 436.42 | **489.36** |
| 26 | Total Completion Cost incld. Land and R & R Costs (Sr. No. 24+25) | 386.30 | 3190.28 | **3576.58** |
| 27 | Interest During Construction (IDC) | 19.44 | 160.56 | **180.00** |
| 28 | Total Completion Cost (Sr. No. 26+27) | 405.74 | 3350.84 | **3756.58** |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849fee c29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1 A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.03.15 22:20:30 +05'30'

## परिशिष्ट -३

### प्रकल्प पुर्णत्व खर्चाचा वित्तीय सहभाग आराखडा

| अ.क्र. | तपशील | रक्कम रुपये (कोटी) | सहभागाची टक्केवारी |
|---|---|---|---|
| 1 | केंद्र शासनाचा समभाग | ४९६.७३ | १५.४० |
| 2 | महाराष्ट्र शासनाचा समभाग | ४९६.७३ | १५.४० |
| 3 | केंद्रीय करांच्या ५०% रकमेसाठी केंद्र शासनाचे दुय्यम कर्ज | १४८.५७ | ४.६० |
| 4 | केंद्रीय करांच्या उर्वरित ५०% रकमेसाठी राज्य शासनाचे दुय्यम कर्ज | १४८.५७ | ४.६० |
| 5 | द्विपक्षीय, बहुपक्षीय संस्थांचे कर्जसहाय्य | १९३५.८९ | ६०.०० |
| 6 | केंद्र शासनाच्या अनुदानाकरिता पात्र प्रकल्प किंमत | **३२२६.४९** | **१००%** |
| 7 | राज्य कराकरिता राज्य शासनाचे बिनव्याजी दुय्यम कर्ज | २५९.६५ | - |
| 8 | भूसंपादनाकरिता राज्य शासनाचे बिनव्याजी दुय्यम कर्ज | २४.८६ | - |
| 9 | राज्य शासनाचे राज्य शासनाचे बिनव्याजी दुय्यम कर्ज | ६५.३४ | - |
| 10 | पुणे महानगरपालिकेचे जमिनीसाठीचे योगदान | ०.२४ | - |
| 11 | बांधकाम कालावधी दरम्यानच्या व्याजाकरिता (द्विपक्षीय/बहुपक्षीय वित्तीय संस्थांकडूनच्या कर्जावरील व्याज) राज्यशासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज. | १८०.०० | - |
| **एकूण प्रकल्प पुर्णत्व किंमत** | | **३७५६.५८** | |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.03.15 22:20:47 +05'30'

## परिशिष्ट -४

**वनाज ते रामवाडी (मार्गिका क्र. २ए) व रामवाडी ते वाघोली(विठ्ठलवाडी) (मार्गिका क्र. २बी) मेट्रो प्रकल्प राबविण्याकरीता लागणारा निधी उभारण्याचे इतर विविध स्त्रोत:-**

सदर प्रकल्पाकरीता इतर निधी उभारण्याचे स्त्रोत खालीलप्रमाणे प्रस्तावित करण्यात येत आहेत:-

अ. मेट्रो मार्गिकांच्या दोन्ही बाजूस ५०० मी. अंतरापर्यंत येणाऱ्या जमिनीवर, अधिमूल्य आकारुन अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक (एफ.एस.आय.) देण्याची तरतूद विकास नियंत्रण नियमावलीत करुन त्यानुसार अधिमूल्याची रक्कम संबंधित क्षेत्रातील नियोजन प्राधिकरणाने वसूल करणे व अशा वाढीव चटईक्षेत्र निर्देशांकापोटी वसूल केलेल्या अधिमूल्याच्या रक्कमेपैकी ५०% रक्कम सदर मेट्रो प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेकडे वर्ग करणे.

ब. महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ च्या तरतूदींनुसार महत्वपूर्ण नागरी वाहतूक प्रकल्प राबविण्यात येणाऱ्या शहरात विकास शुल्कात १००% पर्यंत वाढ करून आकारण्याविषयी कायद्यातील तरतूदीनुसार पुणे महानगरपालिका क्षेत्रात वसूल होणाऱ्या रक्कमेमधून उचित हिश्श्याची रक्कम सदर मेट्रो प्रकल्पाकडे वर्ग करणे.

क. महत्वाकांक्षी नागरी वाहतूक प्रकल्प राबविण्यात येणाऱ्या शहरात मालमत्तेचे मुद्रांक शुल्कासोबतच १ टक्के अधिभार लावण्याची तरतूद सन २०१५ चा अधिनिमय क्र.३७ दिनांक २१.०८.२०१५ अन्वये महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमचे कलम १४९ मध्ये सुधारणा करण्यात आली आहे. याद्वारे पुणे महानगरपालिका क्षेत्रात वसूल होणाऱ्या रक्कमेमधून उचित हिश्श्याची रक्कम सदर प्रकल्पासाठी वर्ग करणे.

ड. मेट्रो कार डेपोच्या जागा तसेच प्रकल्प अंमलबजावणी संस्थेला हस्तांतरीत जमिनींच्या वाणिज्यिक विकसनाव्दारे प्राप्त होणारे उत्पन्न प्रस्तुत प्रकल्पासाठी वापरणे.

इ. मेट्रो रेल्वे प्रकल्पाच्या आगमन/निर्गमन ठिकाणी, स्थानकांच्या नावांचे ब्रँडींग, डेपो, स्थानकांवरील जाहिरात तसेच ट्रेन कोचेस रॅपिंग च्या माध्यमातून जाहिरात व पार्कींगपासून मिळणारे उत्पन्न या प्रकल्पासाठी वापरणे इ.

ई. मेट्रो स्थानकांवर स्थित किऑस्क, एटीएम सेंटर्स इ. माध्यमातून मिळणारे उत्पन्न.

सदर विविध स्त्रोतांतून प्राप्त होणारा निधी हा एका "समर्पित नागरी परिवहन निधीमध्ये" जमा करावयाचा असून तो निधी सदर प्रकल्पासाठी घेतलेल्या कर्जाची परतफेड, कार्य व देखभाल (O&M), भविष्यात येणाऱ्या पायाभूत सुविधा प्रकल्पाच्या अंमलबजावणी करण्यासाठी इ. साठी महामेट्रोने वापरावयाचा आहे.

## परिशिष्ट ५
## उच्चाधिकार समितीची रचना व कार्यकक्षा

**अ. उच्चाधिकार समितीची रचना :-**

राज्यातील सर्व मेट्रो रेल्वे प्रकल्पांच्या अंमलबजावणीच्या दृष्टीकोनातून धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी/अडचणींचे निराकरण करण्यासाठी शासनातर्फे खालीलप्रमाणे कायमस्वरूपी उच्चाधिकार समिती (High Power Committee) स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| अध्यक्ष | : | मा. मुख्य सचिव |
| सदस्य | : | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग |
| सदस्य | : | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग |
| सदस्य | : | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, वित्त विभाग. |
| सदस्य | : | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, नियोजन विभाग. |
| सदस्य | : | प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग |
| सदस्य | : | मेट्रो रेल्वे प्रकल्प ज्या महसुली विभागात राबविण्यात येतो त्या विभागाचे विभागीय आयुक्त |
| सदस्य | : | मेट्रो रेल्वे प्रकल्प ज्या जिल्ह्यात राबविण्यात येतो त्या जिल्ह्याचे जिल्हाधिकारी. |
| सदस्य | : | मेट्रो रेल्वे प्रकल्प ज्या मनपा क्षेत्रात राबविण्यात येतो त्या मनपाचे आयुक्त (प्रशासकीय प्रमुख) |
| सदस्य सचिव | : | संबंधित मेट्रो प्रकल्प अंमलबजावणी संस्थेचे प्रशासकीय प्रमुख |

**ब. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे आहे :-**

i. अंमलबजावणीधीन मेट्रो प्रकल्प उभारणे व परिचलन करणे या संबंधातील धोरणात्मक बाबींवर निर्णय घेणे.

ii. उक्त मेट्रो प्रकल्पा संदर्भात जमीन वापर बदल, वाढीव चटई क्षेत्र निर्देशांक व तद्नुषंगिक सवलती देण्यासंदर्भात निर्णय घेणे.

iii. उक्त मेट्रो प्रकल्पाला राज्य शासनाचाराज्य शासनाच्या संस्था यांचा/ देय हिस्सा वितरित करण्यासाठी निर्देश देणे.

iv. उक्त मेट्रो प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालात नमूद केल्याप्रमाणे अथवा आवश्यकतेप्रमाणे इतर आर्थिक पर्यायांच्या अंमलबजावणीसाठी निर्देश देणे व त्यासाठी कालबध्द कार्यक्रम ठरवून देणे.

v. राज्य शासनास वाटतील असे तसेच मेट्रो प्रकल्प अंमलबजावणीच्या अखत्यारित नसलेल्या बाबींवर निर्णय घेणे. केंद्र व राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार उक्त मेट्रो प्रकल्पामध्ये आवश्यक त्या सुधारणा/ बदल करून अंमलबजावणीस मान्यता देणे.

*******